**<u>महाराष्ट्र राज्य महिला आयोगाकडे - महिला समुपदेशन केंद्र ही योजना वर्ग करण्याबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन

महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांक **:** संकीर्ण -२०१०/ प्र.क्र. ४२३(भाग -२)/ का-२
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
**दिनांक : २२ फेब्रुवारी, २०११.**

**वाचा** :- १) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमआयएस-०६९५/स्टेट/३/पोल-१३, दि. २४ जून, १९९६.
२)शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२००१/प्रक्र.६८/का.२, दि.१६ ऑगस्ट,२००१.
३)शासन शुध्दीपत्रक , महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२००१/प्रक्र.६८/का.२, दि.१६ ऑगस्ट,२००३.
४) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२००४/प्रक्र.१९/का.२, दि.५ डिसेंबर, २००५
५) शासन पत्र ,महिला व बाल विकास विभाग, क्र. मसके -२००५/प्रक्र.२०२/का.२, दि.१८ मे,२००६.
६)शासन शुध्दीपत्रक ,महिला व बाल विकास विभाग, क्र.संकीर्ण-२००४/प्रक्र.१९/का.२, दि.१९ ऑगस्ट,२००६.
७)शासन निर्णय ,महिला व बाल विकास विभाग, क्र. मसके -२००५/प्रक्र. २०२/का.२, दि.२१ जानेवारी,२००६.
८)शासन निर्णय ,महिला व बाल विकास विभाग, क्र. मसके -२००६/प्रक्र. २५६/का.२, दि.१७ ऑक्टोबर,२००६.
९)शासन निर्णय ,महिला व बाल विकास विभाग, क्र. मसके -२००७/प्रक्र. २३७/का.२, दि.३ नोव्हेबर,२००७
१०)शासन निर्णय ,महिला व बाल विकास विभाग, क्र. मसके -२००६/प्रक्र. २५६/का.२, दि. २२ ऑगस्ट,२००८
११)शासन निर्णय ,महिला व बाल विकास विभाग, क्रमांक : संकीर्ण -२००९/ प्र.क्र. ३०६/ का-२, दिनांक :३० जून, २०१०.
१२) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ/समुपदेशन केंद्रे/ महिला आयोग/ हस्तांतरण/६७४४/१०-११, दि.२/५.१०.२०१०
१३)शासन निर्णय ,महिला व बाल विकास विभाग, क्रमांक : संकीर्ण -२००९/ प्र.क्र. ३०६/ का-२, दिनांक :१८.१.२०११.

**<u>प्रस्तावना</u> :-** महिलांवर व बालकांवर होणाऱ्या अत्याचारांना प्रतिबंध करुन त्यांना संरक्षण /मदत उपलब्ध करुन देण्याचे दृष्टीने केंद्र शासनाने प्रामुख्याने ज्या सूचना केलेल्या होत्या, त्या अनुषंगाने उपाययोजना करण्यासाठी अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली कृतिदलाची (TASK FORCE) स्थापना करण्यात आलेली होती. सदर कृतिदलाच्या बैठकीमध्ये झालेल्या विचार विनिमयानुसार टाटा सामाजिक विज्ञान संस्था, मुंबई या संस्थेकडून मुंबईतील तीन पोलीस ठाण्यांच्या आवारामध्ये सन १९९४ पासून चालविण्यात येणाऱ्या कौटुंबिक हिंसाग्रस्त व पीडीत महिलांसाठीच्या समुपदेशन केंद्राच्या धर्तीवरच आणखी काही ठिकाणी महिला समुपदेशन केंद्रे चालविण्याची शिफारस कृतिदलाने केली होती. त्या अनुषंगाने संयुक्त राष्ट्र संघटनेच्या युनिफेम (Unifem-United Nations Development Fund for Women) या आंतरराष्ट्रीय संस्थेने तीन वर्षाच्या कालावधीकरीता उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून टाटा सामाजिक विज्ञान संस्थेच्या मदतीने राज्यात ३ समुपदेशन केंद्रासह एकुण १० ठिकाणी महिला समुपदेशन केंद्रे चालविण्यात येत होती. राज्य शासन, टाटा सामाजिक विज्ञान संस्था आणि युनिफेम यांच्यामध्ये झालेल्या सामंजस्य करारानुसार, कराराचा कालावधी संपल्यानंतर सदरील केंद्रांचा आढावा घेऊन उपयुक्त वाटल्यास राज्य शासनाने ती पुढील कालावधीकरीता चालवावीत, तसेच, भविष्यात निर्माण करावयाच्या

इतर केंद्रांना देखील त्याच अटींवर मंजुरी देण्यात यावी, असा निर्णय दि.१६.८.२००१ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे. सदर शासन निर्णयास अनुसरुन सदर १० महिला समुपदेशन केंद्रे दि.५ डिसेंबर, २००५ च्या शासन निर्णयानुसार राज्य शासनामार्फत चालविण्याचा निर्णय घेण्यात आला. त्यानंतर शासन निर्णय दिनांक १७ ऑक्टोबर, २००६ अन्वये नवीन १० समुपदेशन केंद्र सुरु करण्यास मान्यता देण्यात आली. त्याअनुषंगाने सध्या राज्य शासनामार्फत १८ जिल्हयात २० महिला समुपदेशन केंद्रे कार्यरत आहेत. तसेच क्रिमीनल अपील क्र.३५९/२००८ संदर्भात मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशास अनुसरुन आणि अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली दि.२१.८.२००९ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयास अनुसरुन उर्वरित १६ जिल्हे व मुंबई पोलीस आयुक्त कार्यक्षेत्रात अतिरिक्त ३ असे एकुण १९ महिला समुपदेशन केंद्रे सुरु करण्यास शासन निर्णय दि.३० जून, २०१० अन्वये मान्यता देण्यात आलेली आहे. याप्रमाणे राज्यात सध्या एकूण ३९ समुपदेशन केंद्रांना मंजूरी देण्यात आलेली आहे.

**२.** राज्यात स्त्रियांवरील अत्याचारांचे निराकरण होवून त्यांना विकासाची नवी दिशा उपलब्ध व्हावी यासाठी केंद्र व राज्य शासनाने नवीन धोरणे ठरविली , नवीन कायदे केले. या धोरणांची व कायदयांची चांगल्या प्रकारे व परिणामकारक रितीने अंमलबजावणी व्हावी, महिलांचा सामाजिक दर्जा उंचावून त्यांच्या सर्वांगीण विकासाला चालना मिळावी याकरीता महाराष्ट्र शासनाने, केंद्र शासनाच्या राष्ट्रीय महिला आयोगाप्रमाणे महाराष्ट्र राज्य महिला आयोगाची स्थापना दिनांक २५ जानेवारी १९९३ रोजी केली आहे. या महिला आयोगाचे सर्वसाधारणपणे -महिलांच्या संरक्षणात्मक कायदयाचा भंग झाल्यास योग्य त्या न्यायाधिकरणाकडे तक्रार दाखल करणे , न्यायालये व लोकन्यायालयात उपस्थित राहून आपले मत मांडणे. गरीब पिडीत स्त्रियांना त्यांच्यावर होणा-या अत्याचाराविरुध्द लढा देता यावा यासाठी मोफत सल्ला व मार्गदर्शन उपलब्ध करुन देणे, स्त्रियांवरील होणा-या अत्याचारांच्या केसेसवर लक्ष ठेवून चौकशी करणे, पोलीस कारवाईवर लक्ष ठेवणे, स्त्रियांना कामाच्या ठिकाणी विविध उद्योग धंदयात होणारे आजार, शैक्षणिक सुविधा, कामाच्या ठिकाणी होणारा लैंगिक छळ व इतर समस्यांचा अभ्यास करुन महिलाविषयक धोरण आखण्यासाठी शासनास मदत करणे तसेच सल्ला व मार्गदर्शन करणे, इ. कार्यक्षेत्र आहे.

**३.** वरीलप्रमाणे राज्य महिला आयोगाचे कार्यक्षेत्र पाहता आयोग मुख्यतःमहिलांवर होणा-या अन्याय, अत्याचाराची दखल घेते. पिडीत महिला, महिला आयोगाकडे त्यांच्यावर झालेल्या अत्याचाराबाबत तक्रारही करु शकतात. राज्य शासनाकडून महिला व बालकांवर होणा-या अत्याचारास प्रतिबंध करण्यासाठी महिला समुपदेशन केंद्रे चालविली जातात. ही योजना (महिला समुपदेशन केंद्र) व राज्य महिला आयोगाचे काम हे एकमेकांना पुरक असल्यामुळे सदरची योजना राबविणे, योजनेचे सनियंत्रण करणे, नविन समुपदेशन केंद्रे सुरु करण्यासाठी कार्यवाही करणे, कार्यरत समुपदेशन केंद्राच्या कामकाजावर लक्ष ठेवून कामकाज प्रभावी होण्यासाठी कार्यवाही करणे ही जबाबदारी राज्य महिला आयोगाकडे सोपविल्यास सर्व समुपदेशन केंद्र राज्य महिला आयोगाच्या अखत्यारीत

राहतील व महिला आयोगास, महिला व बालकांवरील होणा-या अत्याचारास प्रतिबंध करण्यासाठी, महिलांचे प्रश्न सोडविण्यासाठी, सदरची समुपदेशन केंद्रे अधिक उपयुक्त ठरतील. तसेच समुपदेशन केंद्राना अनुदान वितरीत करण्यासाठी आयुक्तालय स्तरावरुन सर्व समुपदेशन केंद्राकरीता आयोगाच्या मागणीप्रमाणे निर्धारीत दराप्रमाणे निधी राज्य महिला आयोगाकडे सुपूर्द करणे अधिक सोईचेही होईल. या सर्व बाबी विचारात घेवून, महिला व बालकांवर होणा-या अत्याचारास प्रतिबंध करण्यासाठी महिला समुपदेशन केंद्रे ही योजना महाराष्ट्र राज्य महिला आयोगाकडे हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** समूपदेशन केंद्र हा महिला व बाल विकास, पोलीस आणि महिला संस्थांचा, महिला व बालकांच्या अत्याचाराविरुध्द काम करणारा एकत्रित कार्यक्रम असून, स्त्रियांना शांतताप्रिय व हिंसाचारमूक्त जिवन जगण्याची संधी या समूपदेशन केंद्राच्या माध्यमातून दिली जात असल्याने व राज्य महिला आयोगाचे कामकाज अधिक प्रभावी होण्यासाठी प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे महिला समुपदेशन केंद्राची योजना आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांच्याकडून राज्य महिला आयोगाकडे हस्तांतरीत करुन योजनेचे संपूर्ण प्रशासकीय नियंत्रण महाराष्ट्र राज्य महिला आयोगाकडे सोपविण्यात येत आहे.

२. महिला समुपदेशन केंद्राच्या खर्चासाठी, मुख्य लेखाशिर्ष, मागणी क्र.एक्स-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाजकल्याण, १०३, महिला कल्याण, (२१) (०१) महिला समुपदेशन केंद्रे, (२२३५ ३१७ ७) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)", या खालील निधीचे नियंत्रणासाठी पूर्वी प्रमाणेच नियंत्रक अधिकारी हे आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे हे राहतील. तर जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी असतील आणि महिला समूपदेशन केंद्राचा अहवाल , उपयोगिता प्रमाणपत्र व लेखा विवरणपत्रे पडताळून शिफारशीसह महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई यांना सादर करतील. राज्य महिला आयोगाच्या शिफारशीप्रमाणे व मागणीनुसार राज्य महिला आयोग किंवा जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी यांच्याकडे आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे हे सर्व समुपदेशन केंद्राकरिता निर्धारित दराप्रमाणे निधी सुपुर्द करतील.

३. महिला समुपदेशन केंद्राचे प्रशासकीय नियंत्रण जरी राज्य महिला आयोगाकडे सोपविलेले असले तरी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे हे सदर केंद्राच्या योग्य अंमलबजावणी, अडी-अडचणी, विहित वेळेत निधीचे वाटप, इ. बाबीसंदर्भात त्यांना त्यांच्या कार्यवाहीपासून मूक्त करण्यात आलेले नाही. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे व राज्य महिला आयोग यांनी समुपदेशन केंद्राच्या अडि-अडचणी, निधीचे वाटप, योजनेच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने करावयाच्या उपाययोजना, इ. बाबत वेळोवेळी एकत्रित आढावा घ्यावा.

४. महिला समुपदेशन केंद्रासंदर्भात सर्व संबंधीत संस्थांनी यापुढील पत्रव्यवहार सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई यांच्याकडे करण्यात यावा.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईट वर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०११०२२२२०००३७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(जयंत जनबंधु )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
मा. राज्यपांलांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (गृह ), यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री / राज्यमंत्री (म. बा. वि.), यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री याचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, (व्यय)/(लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, सार्वजनिक आराग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, ग्राम विकास ि विभाग, मंत्रालय, मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
पोलिस महासंचालक, पोलिस मुख्यालय, मंबई.
विशेष पोलीस महानिरीक्षक (महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष, पुणे
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला आयोग, मुंबई
महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई
सर्व निबंधक, उच्च न्यायालय, खंडपीठ, नागपूर /औरंगाबाद
सर्व जिल्हा न्यायाधीश, जिल्हा न्यायालय,
सर्व जिल्हाधिकारी
राज्य समन्वयक (PPMU), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व पोलिस आयुक्त /पोलिस अधिक्षक,
महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), नागपूर
उप आयुक्त, (महिला विकास), महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग.
सर्व अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
समन्वयक, महिला व बालकांचे विशेष कक्ष, टाटा सामाजिक विज्ञान संस्था, देवनार, मुंबई.
सर्व महिला समुपदेशन केंद्र / सेवा पुरविणारे /सर्व आश्रयगृहे (आयुक्त, म. व बा. वि., पुणे यांच्या मार्फत )
निवड नस्ती, का.२,